महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ चे कलम ४५१ अन्वये सांगली मिरज कुपवाड शहर महानगरपालिकेच्या महासभेने दि.१९/०९/२०१९ रोजी पारित केलेला ठराव क्र.९५ निलंबीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एमयुपी-२०२०/प्र.क्र.०८/नवि-१९**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २९ सप्टेंबर, २०२०

वाचा :-

१) श्री. विष्णु माने, नगरसेवक, सांगली मिरज कुपवाड शहर महानगरपालिका यांचे दि.२१/१२/२०१९ व दि.२२/०१/२०२० रोजीचे पत्र.
२) श्री. भालचंद्र (रुपेश) मोकाशी, शिवसेना शहर प्रमुख, कुपवाड यांचे दि.१७/०१/२०२० रोजीचे पत्र.
३) आयुक्त, सांगली मिरज कुपवाड शहर महानगरपालिका यांचे क्र. मनपा/आरोवि/सां/१/१०२४/२०१९-२०, दि.१८/०२/२०२० रोजीचे पत्र.

प्रस्तावना :

राष्ट्रीय शहरी आरोग्य अभियानांतर्गत सांगली मिरज कुपवाड शहर महानगरपालिका कार्यक्षेत्रामधील झोपडपट्टी व विस्तारीत भागातील नागरीकांना वैद्यकीय सेवा पुरविण्यासाठी व शहरी आरोग्य व्यवस्थेचे बळकटीकरण करण्याकरीता अर्बन कम्युनिटी हेल्थ सेंटर ( Urban Community Health Centre ) उभारणे प्रस्तावित आहे. सदर अर्बन कम्युनिटी हेल्थ सेंटर उभारण्याकरीता आरक्षीत असलेली महानगरपालिकेच्या मालकीच्या जागेव्यतीरिक्त खाजगी जागा खरेदी करण्याच्या अनुषंगाने सांगली मिरज कुपवाड शहर महानगरपालिकेच्या महासभेने दिनांक १९/०९/२०१९ रोजी पारित केलेला ठराव क्र.९५ हा महानगरपालिकेच्या आर्थिक नुकसानीचा असल्याने सदर ठराव विखंडीत करण्याची विनंती श्री. विष्णू माने व श्री. भालचंद्र मोकाशी यांनी त्यांच्या संदर्भीय पत्र क्र.१ व २ अन्वये शासनास केली आहे.

०२. तद्नुसार क्र.१ व २ येथील संदर्भीय पत्राच्या अनुषंगाने, आयुक्त, सांगली मिरज कुपवाड शहर महानगरपालिका यांच्याकडून संदर्भीय क्र.३ येथील पत्रान्वये अहवाल प्राप्त झाला आहे. या अहवालानुसार अर्बन कम्युनिटी हेल्थ सेंटर उभारण्याकरीता महानगरपालिकेच्या वारणाली कुपवाड परिसरात स्वमालकीची जागा उपलब्ध असुन सदर जागा याच प्रयोजनासाठी आरक्षण क्र.३३४ अन्वये आरक्षीत आहे. त्यानुसारच सदर आरक्षीत जागेवर अर्बन कम्युनिटी हेल्थ सेंटर इमारत बांधकामाचे डिझाईन शासन स्तरावरुन निश्चित होऊन या कामी निधी मंजूर केल्याचे दिसून येते. असे असले तरी, अर्बन कम्युनिटी हेल्थ सेंटर उभारण्याकरीता निश्चित झालेल्या व महानगरपालिकेच्या मालकीच्या आणि त्या प्रयोजनासाठी आरक्षीत असलेल्या जागे व्यतीरिक्त अन्य खाजगी जागा खरेदी करुन त्या ठिकाणी अर्बन कम्युनिटी हेल्थ सेंटर उभारण्याच्या अनुषंगाने महासभेने दिनांक १९/०९/२०१९ रोजी ठराव क्र.९५ पारित केला असल्याचे दिसून येते.

०३. उपरोक्त वस्तुस्थिती पाहता महानगरपालिकेच्या स्वमालकीची जागा उपलब्ध असतांना व सदर जागेवर इमारत बांधकामाचे डिझाईन शासनस्तरावरुन निश्चित झालेले असतांना, खाजगी जागा (बीगर शेती नसलेली, पोहच रस्ता नसलेली, अर्बन लॅण्ड सिलींग असी नोंद असलेली, अनुज्ञेय हेल्थ केयर सेंटरच्या मंजूर नकाशाप्रमाणे जागेच्या आकारमानानुसार बांधकाम शक्य नसलेली ई.) आर्थिक मोबदला देऊन खरेदी करणे हे

महानगरपालिकेच्या आर्थिक हिताच्या विरोधात असल्याचे शासनाचे मत झाल्याने सदरहू ठराव विखंडीत करण्यापुर्वी निलंबित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

सांगली मिरज कुपवाड शहर महानगरपालिकेच्या महासभेने दिनांक १९/०९/२०१९ रोजी पारित केलेला महासभा ठराव क्र.९५ हा महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ मधील कलम ४५१ (१) मधील तरतुदीनुसार प्रथमत: निलंबित करण्यात येत आहे.

०२. तथापि, यावर महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाचे कलम ४५१ (२) नुसार आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्यात संबंधितांना याबाबत अभिवेदन करण्याची संधी देण्यात येत आहे. विहीत मुदतीत अभिवेदन प्राप्त न झाल्यास या अधिनियमातील कलम ४५१ (३) नुसार पुढील कार्यवाही करण्यात येईल.

०३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००९२९१६२१२७४९२५ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ingole Rashmikant

Digitally signed by Ingole Rashmikant
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=58f272615d694188999d7059c35044b641a6f79b7f11b072357a034f1945b5bf, serialNumber=790d7a8a18a9128f2444e4f50cec8c48e1e5b4ac49a5b5b6d6596149b3010e5b, cn=Ingole Rashmikant
Date: 2020.09.29 16:23:37 +05'30'

**( रश्मिकांत इंगोले )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२) महापौर, सांगली मिरज कुपवाड शहर महानगरपालिका, सांगली (द्वारा आयुक्त,सां.मि.कु. मनपा).
३) आयुक्त, सांगली मिरज कुपवाड शहर महानगरपालिका, सांगली.
४) प्रधान सचिव (नवि-२) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
५) निवड नस्ती ( नवि-१९).